National Social Assistance Programme मधील लाभार्थ्यांचे Aadhar Seeding करण्यासाठी दि. १५जुलै,२०१५ ते ३१ जुलै, २०१५ या कालावधीत विशेष मोहिम राबविणे.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णयक्रमांक:विसयो-२०१५/प्र.क्र.२१०/विसयो-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, विस्तार भवन

मुंबई- ४०० ०३२

दिनांक: १५ जुलै, २०१५

**संदर्भ**:- सहसचिव, (विशेष सहाय्य), ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.J-११०११/४/२०१५- NSAP, दि.१२ जून,२०१५

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाच्या Direct Benefit Transfer (DBT) प्रकल्पामध्ये National Social Assistance Programme (NSAP) चा समावेश आहे. NSAP कार्यक्रमामधील (१) इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना (२) इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन योजना (३) इंदिरा गांधी राष्ट्रीय अपंग निवृत्तीवेतन योजना या अंतर्गत समाजातील वृध्द,विधवा,अपंग लाभार्थ्यांना मासिक निवृत्तीवेतन देण्यात येते. या लाभार्थ्यांची जिल्हानिहाय/तालुकानिहाय Digitized यादी केंद्र शासनाच्या nsap.nic.in या संकेत स्थळावर उपलब्ध आहे. या Digitized यादीमध्ये लाभार्थ्यांचा आधार क्रमांक भरण्याची सुविधा उपलब्ध आहे. परंतु, असे निदर्शनास आले आहे की, राज्यातील फक्त २४.५० टक्के लाभार्थ्यांचे या Digitized यादीमध्ये आधार क्रमांकाचे सिडींग झाले आहे. हे प्रमाण अत्यंत कमी आहे. DBT प्रकल्पाचा मा.पंतप्रधानांच्या कार्यालयामार्फत आढावा घेण्यात येतो. यास्तव, NSAP योजनेमधील लाभार्थ्यांच्या आधार क्रमांकाचे दि. ३१ जुलै,२०१५ पर्यंत १०० टक्के सिडींग करण्याचे केंद्र शासनाचे निर्देश संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झाले आहेत. त्याअनुषंगाने "विशेष मोहिमेचे" आयोजन करुन १०० टक्के आधार सिडींग पूर्ण करण्यासाठी शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

विशेष मोहिमेची खालील प्रकारे अंमलबजावणी करण्यात यावी:-

(१) विशेष मोहिमेची दि. १५ जुलै,२०१५ ते ३१ जुलै,२०१५ या कालावधीत अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हाधिकारी कार्यालयाने सर्व तालुकास्तरावरील कार्यालयांना आदेश निर्गमित करावेत.

(२) तालुकास्तरावरील संबंधित तहसिलदार/नायब तहसिलदार यांनी NSAP योजनेमधील १) इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्तीवेतन योजना २) इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्तीवेतन योजना ३) इंदिरा गांधी राष्ट्रीय अपंग निवृत्तीवेतन योजना या तिन्ही योजनांची गावनिहाय यादी संबंधित तलाठी यांना दयावी.

(३) या यादीमध्ये स्वतंत्र स्तंभात ज्या लाभार्थ्यांचा आधार क्रमांक प्राप्त झाला आहे तो नमूद करावा, व ज्यांचा आधार क्रमांक मिळालेला नाही, ती जागा रिकामी ठेवावी.

(४) तलाठी यांनी गावातील अंगणवाडी सेविका यांची बैठक घेऊन त्यांना कार्यक्रमाची माहिती दयावी व लाभार्थ्यांची यादी त्यांना समप्रमाणात क्षेत्रनिहाय वाटून दयावी.

(५) जिल्हाधिकारी कार्यालयाने विशेष मोहिमेस स्थानिक वर्तमानपत्रामध्ये विस्तृत प्रसिध्दी दयावी.

(६) अंगणवाडी सेविका ज्या कालावधीत गावात यादी घेऊन आधार क्रमांक संकलित करण्यास जाणार आहेत त्याची तत्पूर्वी गावात दवंडी देण्यात यावी.

(७) अंगणवाडी सेविका यांनी लाभार्थ्यांच्या घरोघरी भेट देऊन आधार क्रमांक संकलित करावा व खात्री करुन यादीतील "आधार क्रमांक" या रकान्यात भरावा. तद्नंतर यादीचे शेवटी अंगणवाडी सेविका यांचे नाव,स्वाक्षरी तलाठी यांनी घ्यावी. सर्व यादीच्या तळाशी तलाठी यांनी शिक्यानिशी स्वाक्षरी करावी .

(८) वरीलप्रमाणे कार्यपध्दतीमध्ये ज्या लाभार्थ्यांनी आधार नोंदणी केली आहे, अशा लाभार्थ्यांचे UID क्रमांक प्राप्त होतील.

(९) ज्या लाभार्थ्यांनी आधार नोंदणी अदयापही केलेली नाही, अशा लाभार्थ्यांची स्वतंत्र यादी तलाठी यांनी अंगणवाडी सेविका यांचे काम पूर्ण झाल्यावर तयार करावी.

(१०) केंद्र शासनाने संदर्भाधीन पत्रासोबत पाठविलेल्या Permanent Enrolment Centers ची यादी सोबत जोडली आहे.

(११) आधार नोंदणी न केलेल्या लाभार्थ्यांना Permanent Enrolment Centers वर नोंदणीसाठी घेऊन येण्यासाठी तालुकास्तरावरील संबंधित तहसिलदार/ नायब तहसिलदार यांनी Micro Plan ची आखणी करावी. त्याची देखिल स्थानिक वृत्तपत्रात विस्तृत प्रसिध्दी करण्यात यावी. गावपातळीवर दवंडी देण्यात यावी.

(१२) आधार क्रमांक संकलित करण्यासाठी अंगणवाडी सेविकांना प्रति लाभार्थी रु.५/- (रु.पाच फक्त) इतका मोबदला कागदपत्रांची तपासणी करुन तहसिलदार कार्यालयामार्फत अदा करण्यात यावा.यावरील खर्च केंद्र शासनाच्या ३ टक्के प्रशासकीय निधीमधून भागविण्यात यावा.

(१३) वरीलप्रमाणे प्राप्त झालेल्या लाभार्थ्यांच्या आधार क्रमांकाचे तसेच लाभार्थ्यांची आधार नोंदणी झाल्यावर EID क्रमांकाचे केंद्र शासनाच्या nsap.nic.in या संकेतस्थळावर सिडींग करण्यात यावे.

(१४) जिल्हाधिकारी यांनी विशेष मोहिम पूर्ण झाल्यावर सविस्तर अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७१५११४३५८८३२२ असा आहे. हा डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan K Wagh

Digitally signed by Gajanan K Wagh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Gajanan K Wagh
Date: 2015.07.15 11:50:25 +05'30'

( ग.कि. वाघ )
सहसचिव, महाराष्ट्र शास

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,

२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव
४) सर्व राज्यमंत्र्यांचे खाजगी सचिव
५) सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा (१/२ , महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर)
८) सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली
९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१०) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त कार्यालय
११) संचालक, नागरी प्रशासन, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
१२) वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
१३) सर्व मंत्रालयीन विभाग / सर्व विभागीय आयुक्त/ सर्व महानगरपालिका आयुक्त/
१४) सर्व जिल्हाधिकारी / सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६) अधिदान व लेखा अधिकारी व लेखा कार्यालय, मुंबई
१७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१८) सर्व उपविभागीय अधिकारी (प्रांत अधिकारी) / सर्व तहसिलदार
१९) सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती /कार्यासन विसयो-२